चार वर्षातून एकदा महाराष्ट्रात कोठेही जाण्यास रजा प्रवास सवलत.

जिल्हा परिषद कर्मचा-यांना लागू करण्या-बाबत...

**महाराष्ट्र शासन,**
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांकः रप्रस 1196/प्र.क्र.14/सेवा-5,
मंत्रालय, मुंबई 400032, दिनांक 31 जानेवारी 1996.

## शासन निर्णय

केंद्र शासनाने आपल्या कर्मचा-यांना चार वर्षातून एकदा, देशात कोठेही जाण्यास "रजा प्रवास सवलत" ही योजना मंजूर केली आहे. केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्य शासकीय कर्मचा-यांनाही अशा प्रकारची "चार वर्षातून एकदा राज्यात कोठेही जाण्यास रजा प्रवास सवलत" योजना विहित अटींच्या अधीन राहून शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक रप्रस 1194/184/सेवा-5, दिनांक 28 मार्च 1995 अन्वये लागू केली आहे. राज्य शासकीय कर्मचा-यांना लागू असणा-या सेवाशर्ती सर्वसाधारणपणे जिल्हा परिषदेकडील कर्मचा-यांनाही लागू करण्याचे शासनाचे धोरण राहिले आहे. त्यामुळे जिल्हा परिषदेकडील कर्मचा-यांना "चार वर्षातून एकदा महाराष्ट्रात कोठेही जाण्यास रजा प्रवास सवलत" ही योजना लागू करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

2. शासन आता, महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, 1961 (सन 1962 चा अधिनियम, क्रमांक 5) च्या कलम 248 च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार व त्यासंबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करून असे आदेश देत आहे की, जिल्हा परिषदांच्या ज्या कर्मचा-यांना, स्वग्राम रजा प्रवास सवलतीबाबतची शासन अधिसूचना, ग्राम विकास विभाग क्रमांक टीआरए 1065/एस, दिनांक 12 ऑगस्ट 1971 (वेळोवेळी सुधारल्याप्रमाणे) लागू आहे, त्या जिल्हा परिषदेच्या कर्मचा-यांना, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक रप्रस 1194/184/सेवा-5, दिनांक 28 मार्च 1995 मधील तरतुदी योग्य त्या फेरफारांसह लागू करण्यात याव्यात.

3. शासन असाही आदेश देत आहे की, वरील योजनेवरील खर्च "स्वग्राम रजा प्रवास सवलत" यासाठी खर्ची घालण्यात येणा-या संबंधित प्रमुख लेखाशीर्षाखालील ज्या लेखाशीर्षाखाली त्याच्या सहायक अनुदानाचा खर्च खर्ची घालण्यात येतो त्या उपलेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व तो चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श.वि.लागवणकर,
शासनाचे उप सचिव, वित्त विभाग.

प्रति,

महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालखापाल-1 (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,

राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

मंत्रालयीन सर्व विभाग,

सर्व विभागीय आयुक्त,

मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,

* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.261, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,

उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,

जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

वित्त विभागातील सर्व कार्यासने,

निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-5.

* पत्राद्वारे

---

एच-1389(14,000+10-2-96)